(33)

52

**प्रशासकीय मान्यता-**
×नंदूरबार येथे जिल्हा न्यायालयाची इमारत बांधणे..

**महाराष्ट्र शासन**
**विधी व न्याय विभाग,**
शासन निर्णय क्र.सीसीबी ४००१/(प्र.क्र. ११५)/का.१३
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दि. २८ मे, २००९.

पहा :- १) विधी व न्याय विभाग, शासन निर्णय क्र.सीसीबी ४००१/(प्र.क्र. ११५)/का.१३, दि. ५ एप्रिल, २००६.
२) प्रबंधक (निरिक्षणे-२),उच्च न्यायालय, मुंबई यांचे पत्र क्र.बी(डब्ल्यू)/६०४२/२०००, दि.१० मार्च, २००८.
३) प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, धुळे यांचे पत्र क्र. जा.क्र.६६३/२००८, दि.१४.२.२००८.

**शासन निर्णय** :- वरील क्रमांक १ येथील शासन निर्णय याद्वारे रद्द करण्यात येत आहे. व नंदुरबार येथे जिल्हा न्यायालयाची नवीन इमारत बांधावयाच्या रु. २०,५७,४०,६००/- (रु. वीस कोटी सत्तावन्न लक्ष चाळीस हजार सहाशे फक्त) इतक्या अंदाजित खर्चाच्या कामास (खाली नमुद केलेल्या विगतवारीनुसार) याद्वारे नव्याने प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १ | इमारत बांधकाम | १३,१७,३८,४४९ |
| २ | कंपाऊंडभिंत बांधकाम | २४,२१,०७२ |
| ३ | स्लॅब ड्रेनचे बांधकाम | २,४१,८०० |
| ४ | अंतर्गत रस्ते बांधकाम | १६,९२,८८० |
| ५ | आकस्मिक खर्च ४% | ५४,४३,७६८ |
| ६ | भू-विकास (अंदाजित खर्च) | १०,००,००० |
| ७ | पाणीपुरवठा व मलःनिस्सारण ८% | १,०५,३९,०७६ |
| ८ | विद्युतीकरण करण्यासाठी खर्च १०% | १,१८,५६,४६० |
| ९ | इनव्हेशन गाडनिंग आणि लिफ्ट १०% | १,३१,७३,८४५ |
| १० | ऑफीस फर्निचर १०% | १,३१,७३,८४५ |
| ११ | ध्वजारोहन स्तंभ (L.S.) | १,५०,००० |
| १२ | अग्नीशमन यंत्रणा | १,००,००० |
| १३ | रेन वॉटर, हार्वेस्टींग | ५,००,००० |
| १४ | अपंगांसाठी व्यवस्था | १,००,००० |
| १५ | किंमतीतील वाढ १०% | १,३६,०९,४२० |
| | | **एकूण रु. २०,५७,४०,६९५**<br>**म्हणजेच रु. २०,५७,४०,६००** |

२. ही प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

अ) प्रस्तुत इमारतीचे काम वास्तुशास्त्रज्ञ यांच्याकडून मांडणी नकाशा तयार करुन घेतल्यावरच सुरु करावे.

ब) अंदाजपत्रकात अेलेव्हेशन ट्रीटमेंन्ट, उद्यान विकास व उद्वाहनसाठी १०% रकमेची ठोक तरतूद करण्यात आली आहे. यातील अेलेव्हेशन ट्रीटमेंट व उद्वाहनाचे काम वास्तुशास्त्रज्ञ व जिल्हा न्यायालय व उद्यान विकासाचे काम संचालक वने व उपवने यांच्या सहमतीने करण्यात यावे.

३. या प्रीत्यर्थ होणारा खर्च "मागणी क्र.एच-८, ४०५९-सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च-०१ कार्यालयीन इमारती-१०१ बांधकाम-पंचवार्षिक योजनांतर्गत. योजना-प्रमुख बांधकामे-०३ न्यायदान" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. मात्र, **अर्थसंकल्पात तरतूद केल्याशिवाय कामास सुरुवात करण्यात येऊ नये.**

४. हे आदेश, सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक:-१२८/इमा-२, दि.१९.०९.२००८ व क्रमांक:-२४/इमा-२, दि.१०.०२.२००९ अनुसार त्या विभागाच्या सहमतीने आणि वित्त विभाग शासन निर्णय क्र. क्र मांक:-विअप्र १०००/प्र.क्र.४६/२००१/विनियम, दि.११ जुलै २००१ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उपविभाग-पाच, अनुक्रमांक १, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्र. १३४ अनुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये संबंधित सक्षम प्राधिका-यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( र. ग. पांचाळ )
कार्यासन अधिकारी.

प्रति,
महाप्रबंधक, उच्च न्यायालय , मुंबई,
प्रबंधक (निरीक्षण), उच्च न्यायालय (अपिल शाखा) , मुंबई,
अप्पर जिल्हा व सत्र न्यायाधीश, नंदुरबार,
प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, धुळे,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखापरीक्षा) - एक, महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरीक्षा) , महाराष्ट्र-दोन, नागपूर,
अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, धुळे,
कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नंदूरबार,
(नकाशे व अंदाजपत्रकांच्या प्रतींसह)
उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग, जि. नंदूरबार,
जिल्हा कोषागार अधिकारी, धुळे,
कोषागार अधिकारी, नंदुरबार,
वित्त विभाग (व्यय-६), मंत्रालय, मुंबई,
नियोजन विभाग, का.१४७४, मंत्रालय, मुंबई,
सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मुंबई,
सदस्य सचिव, उर्वरित महाराष्ट्र वैधानिक विकास मंडळ, १८ वा मजला, नवीन प्रशासकीय भवन, मंत्रालयासमोर, मुंबई.
कक्ष अधिकारी, का. ११ व १२ विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई,
निवड नस्ती.